

## यजमान संपादक

सारंग भणगे (पुणे)

## सह-संपादक

सोनाली घाटपांडे (पुणे)

भारती सरमळकर (मुंबई)

स्वप्ना कोल्हे (नाशिक)

सचिन काकडे (मुंबई)

शशिकांत रणवरे (मुंबई)


: संपर्क :

ई साहित्य प्रतिष्ठान
जी ११०२, ईटर्निटी,
मॅरेथॉन चौक
ठाणे - ४००६०४

हा अंक विनामुल्य मिळण्यासाठी, तसेच सूचना; अभिप्राय आणि प्रतिक्रियांसाठी

netaksharee@gmail.com








# भेटीतून भेट

एकटं वाहून शेवटी
आभाळही थकतं,
क्षितीजावर धरेला
हळूच जाऊन टेकतं.

वेल बिलगते वृक्षाला;
फुले अन् वेलीवर,
सारंगांची गर्दी
फुल आणि पाकळीवर.

कळी खुलते हसते
रवीकराच्या पाशात,
भुंगाही मस्त रमतो
कमळाच्या कोषात.

कमळालाही पंकाची
साथ खचित असते,
मंडूकाचे पाऊलही
पंकामध्येच फ़सते.

मंडूकही रिझवू पाही
डराव डराव बेडकीला,
वा-याची आस असते
सताड उघड्या खिडकीला.

वारा तीच्या कांतीला
हळूच स्पर्शून जातो,
मोहोरल्या कायेवर
रोमांच गीत गातो.

रोमांचातून प्रियसखा
भेटीस खास येतो,
दुनियेत सांगा दोस्तहो
कोण भेटीविना राहतो?

-------------------

**सारंग भणगे**





# मैत्री कि प्रेम....?

राहे मनी आठवांचा पसारा,
भेटीत निःशब्द मी होत आहे.

विचारात हे नेमके उलगडेना,
मैत्रीच हि? कि मी प्रेमात आहे.

उगा प्रश्न कल्लोळ माझ्या मनाचा,
कळेना मला, हीच का प्रीत आहे?

तुला गुंफ़ले, गुंतले मी तुझ्यात,
तू नेत्रात माझ्या, नि स्वप्नात आहे.

हलकेच आली मला धुंद निद्रा,
तुझा गाव रे स्वप्न मार्गात आहे.

हृदयात माझ्या तुझे फ़क्त भास,
श्वासात माझ्या तुझे गीत आहे.

नको रे नको, हा निराळाच त्रास,
मला सांग आता, तू, जे सत्य आहे.

--------------------------------

**अम्बरीश देशपांडे**





# शेवटची भेट

आज तुला शेवटची भेटायला आलेय.
तुझ्या मैत्रीच्या सर्व आठवणींची
आज मी समग्र मुर्ती झालेय.
आज तुला शेवटची भेटायला आलेय.

हो रे! कुणाला न सांगता, लपुन छपुन.
तुझ्याशी भेटण्याचं मनात आलं
आणि तडक आलेय निघून.
हो रे! कुणाला न सांगता, लपुन छपुन.

या नंतर असे येता येणार नाही.
संसाराची गाडी ओढताना
हे समजून घ्यावे लागेल तुलाही.
यानंतर असे येता येणार नाही.

मैत्रिणीची आठवण ठेवशील ना?
दोघेही व्यवहारात रमल्यावर
माझी विचारपूस करशील ना?
मैत्रिणीची आठवण ठेवशील ना?

ही माझ्या लग्नाची पत्रिका.
चार दिवसांनी तुझी बायको झाल्यावर
आतल्या मैत्रिणीला विसरायचं नाही बरं का!
ही माझ्या लग्नाची पत्रिका.

-------------------------------------



तुषार जोशी



# शेवटची भेट

एका संध्याकाळी अचानक घरून फ़ोन आला

“त्यांना तुला भेटायच आहे ...
बघ... शक्य असल्यास निघून ये...”

एका मिनिटासाठी डोळे गच्च मिटून घेतले
आजोबा ... असं कसं झालं? ... काही सुचतच नव्हतं ...
फ़ोनवरचे आवाज सुद्धा नकोसे झाले होते ...
तसाच मटकन खाली बसलो ...
शंका कुशंका .... काहूर ... सगळ काही ...

दुस-या मिनिटाला परत एक नंबर फ़िरवला...
“book me on to first available flight for India”

अजून एक फ़ोन .... लगेच निघतोय
“उद्या रात्रीपर्यंत पोचतोय .... पण ...
पण .... उशीर झाला तर थांबू नका ....”
(हे वाक्या कस बोललो ... मला पण काळलं नाही)

रात्र उगाच मोठी वाटली ... एकटी एकटी ...
प्रवासात पण एकच विचार डोक्यात होता ...
भेट होईल ना? कसे असतील आजोबा?
देवाकडे मनोमन काही मागत होतो ...
प्रवास नेहेमीपेक्षा जरा जास्त लांबचा वाटला.

दुस-या दिवशी ... हाँस्पीटलचा डोक्यात जाणारा वास ...

सलाईनच्या विळख्यात अडकलेले आजोबा ...
किलकिलणा-या डोळ्यातून पाहत होते मला ...
एक अस्पष्ट हुंदका ... गहिवरलेला क्षण ...

आम्ही दोघांनी एकमेकांनी मन भरून पाहून घेतलं.
भावना समजायला शब्दांची गरजच नव्हती.
शेवटची भेट .... त्या क्षणात आनंद दुःख ... सगळं सगळं होतं ...

**नंतर कोणी तरी बोलत होतं ...**

**“आजोबांचा जीव नातवात अडकला होता .... सुखाने गेले .....”**

-----------------------------------------

आकाश बिरारी





# पाऊसभेट....

तीला भिजायचय, ती भिजते
त्याला भेटायचय, ती भेटते

दोघेही चालत जातात दूरवर
त्यांच्यासोबत पावसाची सर

तो तिला देतो गुलाबाचं फुल
होकार कळवत तिच्या कानातलं डूल

ती म्हणते हे सर्व कशासाठी
तो हसतो, म्हणतो फ़क्त तुझ्यासाठी

पाऊस बघत असतो त्यांचा हा खेळ
आणि बरसत असतो बराच वेळ

ती म्हणते तू सजवलास रे हा क्षण
आयुष्यभर आठवेल ह्याला माझं मन

तो म्हणतो आयुष्यभराच राहू दे
आता या क्षणी फ़क्त तुला पाहू दे

तो पाहतो, ती लाजते, खाली घालते मान
ती पाहते, ... याचं हरवत भान

दोघेही चिंब भिजत राहतात थेट
त्याची तिला, तिची याला अशी पाऊसभेट.

------------------------------------

**प्रशांत मडपूवार**





# भेट

त्या दोघांची भेट झाली
आमची मात्र टक्कर झाली
त्याला पाहून ती भांबावून गेली
आणि मध्येच थांबून गेली
आमची मात्र ईस्पितळात भरती झाली
मी आणि मैत्रिण, तो आणि मित्र
आपापली वाहने आणायला गेलो, मात्र
मित्र-मैत्रिणीची गाठ पाडली
फ़िरू लागली ती एकत्र
आमची साधी नजर-भेट ही नाही घडली
वयात आलेल्या मला उजवाइची
आईला फ़ारच घाई झाली
मध्ये अंतरपाट आला
नजरा-नजर झालीच नाही
अक्षता पडल्या, अंतरपाटा सरला
मग मात्र दृष्टी हललीच नाही
नियतीने भेट घडवून आणलीच ही ...
आता माझी नाजूक स्कूटी
त्याची हॅंडसम बाइक
पार्किंगमध्ये असते
रात्रभर एकत्र!!

-------------------------------

**रजनी अरणकल्ले**





# पहिली भेट

नाही हो म्हणता म्हणता, एकदाची ती येणार होती
कधी कुठे मग ठरता ठरता, आमची पहिली भेट ठरली होती ...

ठरल्याप्रमाणे ती आली
स्टेशनवर गर्दीत शोधत होती
थोडी लाजत, थोडी घाबरत
ओढणीशी चाळा करीत होती

मी दुरूनच पाहिले तिला, पाहता मला गोड हसली ती
कधी कुठे मग ठरता ठरता, आमची पहिली भेट ठरली होती ...

क्षणभर मग कुणी काहीच बोललं नाही
गाडी हलली ... बाकी काहीच घडलं नाही
काठोकाठ भरलेले ते चार डोळे
आवरता आवरता मग कुणीच सावरले नाही

निःशब्द प्रेमाची भाषा निराळी, न बोलता सहज कळली होती
कधी कुठे मग ठरता ठरता, आमची पहिली भेट ठरली होती ...

तिच्यासोबत नंतर देवळात गेलो
तिला हात जोडताना फ़क्त पहात राहिलो
लोभस किती ते शांत निर्मळ भाव
हरपून भान कसे हरवून गेलो





नव्या नात्याची, नव्या आयुष्याची, तेव्हा जणू नवी रुजवात होती
कधी कुठे मग ठरता ठरता, आमची पहिली भेट ठरली होती ...

निघालो तेव्हा तिचा हात हातात होता
अन् मनाच्या कोप-यात विरह सलत होता
स्टेशनच्या गर्दीत तिचा हात सुटला जेव्हा
दुराव्याचा तो क्षण काळीज चिरत होता

खिडकीतून बघताना वाकून मला, उमाळ्यांना ती अडवित होती
कधी कुठे मग ठरता ठरता, आमची पहिली भेट ठरली होती ...

मी तेव्हा तिथे तसाच उभा
सोबतीला सारे ते क्षण घेऊन
पहिल्या भेटीच्या मोहक सुंदर
ती गेली खूप सा-या आठवणी देऊन

घडतील पुन्हा कितीतरी अशाच, पहिली भेट ती पहिली होती
कधी कुठे मग ठरता ठरता, आमची पहिली भेट ठरली होती ...
-----------------------------------------------------

**रुपेश सावंत**





# भेट

ही भेट तुझी नि माझी
उत्फुल्ल, निसर्गा सखया;
आवेग तुझा, मी भिजते
प्रेमात सुखाच्य प्रांती...

हे रूप तुझे आवेगी,
मी आत आत बावरते
भोगल्या कटू समयाचे
आवर्त मनी का दाटे?

तू क्षणात परतून जाशी,
अतृप्त इथे मी झुरते;
क्षण-भेट तुझी नि माझी
मज आत आत का छळते?

येईन एक दिन, सखया
सदनात तुझ्या गर्भांगी,
मग भेट तुझी नि माझी
व्यापून उरो विश्वाला!

---------------------

**प्रभा प्रभुदेसाई**





# भेट चोरटी

आज तू खुशाल गाल लाल होत जाउ दे,
भेट चोरटी जरा 'जहाल' होत जाउ दे ...

रोज मंद गंध होत अंतरंग व्यापतो,
आज अंग माखण्या गुलाल होत जाउ दे ..

ठेवणीतला नकोस दागिना करू मला,
वापरातला तुझा रुमाल होत जाउ दे ..!

धारदार शब्द चार आरपार मार तू,
त्या जीभेसही कधी मशाल होत जाउ दे ..

स्वप्न-बिप्न सोड, आज थेट भेट नेटकी,
भेटाण्यातली मजा विशाल होत जाउ दे ..

देह लोळतो किती सुखात साजणे तुझा?
हे न फ़ार चांगले, तु 'हाल' होत जाउ दे ..

रोज रोज काय तेच गोड गोड बोलणे??
तू कधी-कधी अशी कमाल होत जाउ दे ..!!

-----------------------------------------

**ज्ञानेश पाटील**





# कळत नाही .....

ही कसली घुसमट
ही कसली उलाघाल
कळत नाही जाते कुठे
ही तरी पायवाट!

मागे आता फ़िरणे नाही
नाही जाता येत पुढे
आयुष्याच्या अनोळख्या वळणावर
अख्खे अस्तित्व उभे!

तस आता माझ्याजवळ
सांगण्यासारखं काय आहे?
तुझ्या-माझ्या भेटीत आता
सवयीचे औपचारिकपण आहे!

हातात हात गुंफ़त नाही
नसतात निवांत भारले क्षण
दोन घटका सोबत सोबत
घालवणे आता नाही जमत!

नाही ही नाखुषी, नाही तक्रार
माहित झालेय आता आपणाला
भेट आपुली आजकाल झालीय
सवयीचाच एक अविष्कार!

म्हणून म्हणते ...........
निरोप घेतला न घेतला
तसाच समजून घे
भेट झाली ना झाली
तपशील भरून घे ........

--------------------

**सोनाली घाटपांडे**





मराठी रसिकांना नेहमी उत्तमोत्तम आणि नवनवीन साहित्य पुरवण्याचा ई साहित्य प्रतिष्ठानचा ध्यास नेटाक्षरी जोमाने पार पाडत आहे. दर वेळी येणाऱ्या तुमच्या प्रतिसादांनी आमचा उत्साह उधाणतोच. याच प्रोत्साहनाच्या बळावर आपण शतक गाठले आणि पुढला प्रवास अधिक जोशाने होत जाईल यात काही शंकाच नाही. नेटाक्षरी हा साप्ताहिक अंक सध्या सुमारे ८५००० मराठी रसिकांना विनामुल्य वितरित केला जातो. या व्यतिरिक्त जुने अंक पहाण्यासाठी **www.esahity.com** या वेबसाईट वर व्हिजीट करणाऱ्यांची संख्या ही लक्षणीय आहे.हे अंक आपण ईष्ट मित्रांना फॉरवर्ड करुन त्यांनाही या आनंदयात्रेत सहभागी करुन घ्यावे.त्याच मेलची **CC** आम्हाला **netaksharee@gmail.com** दिल्यास आम्ही पुढचे अंक त्यांनां विनामुल्य पाठवत राहु. मराठीची लोकप्रियता दिवसेंदिवस वाढत जाण्यात आपलाही हातभार लागावा असे कोणाला नाही वाटणार? आपल्यासारख्याच रसिकांच्या सहाय्याने नेटाक्षरी लवकरच लाखाचा पल्ला पार करील हा विश्वास आहे.

**: ई-साहित्य प्रतिष्ठानची इतर प्रकाशने :**

विनोदाचा दादा - ई-स्टाप, कवितांचा आवाज - स्वरनेटाक्षरी अल्बम,

मुलांचा नेट प्रवेश - बाल नेटाक्षरी, महाराष्ट्राच वैभव – दुर्ग दुर्गट भारी

## : प्रसिद्ध झालेली ई-पुस्तके :

टल्लीची शाळा, ग्रेव्हयार्ड लिटरेचर, मकरंदच्या त्रिवेण्या, मीरा (मराठी अनुवाद),
सावळ्या मुलीची गाणी, देशी दारुचे दुकान (3D), ओथंब, ओथंबर, मोरया, सईची वही,
लोकल गोष्टी, प्रियेचे अभंग, तो आणि ती, अहम् ब्रम्हास्मि,
मराठी कसे लिहावे (ई-शाळा), तॊ, ती आणि सिगरेट, एक होते राजे, आरंभ

वरील सर्व ई-पुस्तके विनामुल्य मिळण्यासाठी सुचना, अभिप्राय किंवा स्वतःचे साहित्य पाठविण्याकरिता

संपर्क : **esahity@gmail.com**

नेटाक्षरीचे अंक नियमीत मिळण्यासाठी सुचना, अभिप्राय किंवा स्वतःचे साहित्य पाठ विण्याकरिता संपर्क :

**netaksharee@gmail.com**

ई-साहित्य प्रतिष्ठानची आजवरची १३६ ई-प्रकाशने सीडीवर उपलब्द्ध शतकोत्सव ५० रुपयात १३६ पुस्तके

संपर्क : ९८६९६७४८२०

**www.esahity.com**

